**अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष रुपये १०.०० लाखापर्यंतच्या वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्यादित) आणि वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित) या दोन्ही महामंडळांमार्फत राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : इमाव २०१९/प्र.क्र.११/महामंडळे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- २८ जानेवारी, २०१९**

**प्रस्तावना :-**

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष रु.१०.०० लाखा पर्यंतच्या वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्यादित) आणि वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित) या दोन्ही महामंडळांमार्फत राबविण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव मा.मंत्रिमंडळाच्या पुढील बैठकीमध्ये सादर करण्याचे निदेश मा.मुख्यमंत्री महोदयांनी दि.०८.०१.२०१९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये दिले आहेत. त्यानुसार दि.१५/०१/२०१९ रोजी झालेल्या मा. मंत्रिमंडळ बैठकीत मंत्रिमंडळाने घेतलेला निर्णय पुढीलप्रमाणे आहे :-

" १) अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष रु. १०.०० लाखापर्यंतच्या वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्यादित) आणि वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित) या दोन्ही महामंडळांमार्फत राबविण्यास मान्यता असावी.

२) या दोन्ही महामंडळाच्या वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजनेकरिता वार्षिक रूपये ५०.०० + ५०.०० कोटी एकूण रु.१००.०० कोटी इतके सहाय्यक अनुदान मंजूर करण्यात यावे.

३) सदर योजना मंत्रिमंडळ टिपणीतील परिच्छेद-२ मधील अ.क्र. १ ते १४ प्रमाणे योजनेच्या स्वरुपास मान्यता असावी.

४) सदर योजनेसाठी मंजूर केलेला निधी पुढील वर्षात खर्च करण्यास मंजूरी असावी.

५) या योजनेसाठी स्वतंत्र लेखाशिर्ष मंजूर करण्यास मान्यता असावी. "

मा.मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष योजनेप्रमाणे बँकेकडून घेतलेल्या रु.१०.०० लाखा पर्यंतच्या वैयक्तिक कर्जावरील व्याज परतावा करण्याची योजना महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्यादित) आणि वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित) या दोन्ही महामंडळामार्फत राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय :-**

शासन याद्वारे, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष योजनेनुसार बँकेकडून घेतलेल्या रु.१०.०० लाखा पर्यंतच्या वैयक्तिक कर्जावरील व्याज (जास्तीत जास्त १२% पर्यंत) परतावा योजना महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्यादित) आणि वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित) या दोन्ही महामंडळांमार्फत राबविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर योजनेचे स्वरुप खालीलप्रमाणे राहील :-

१) **उद्देश:-** बँकेमार्फत लाभार्थींना रु. १०.०० लक्ष पर्यंत रक्कम वितरीत केली जाईल. सदर कर्ज रक्कमेवरील व्याज परतावा हा बँक प्रमाणिकरणानुसार (जास्तीत जास्त १२% पर्यंत) महामंडळाकडून केला जाईल.

२) **पात्रतेसाठी उत्पन्न मर्यादा:-** सध्या महामंडळाच्या योजने करीता लाभार्थींच्या पात्रतेची ग्रामीण व शहरी भागाकरीता रु. १.०० लक्ष कौटुंबिक वार्षिक उत्पन्न मर्यादा आहे. सदर उत्पन्न मर्यादेत वाढ करुन अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या योजनेप्रमाणे सदर योजनेकरिता कौटुंबिक वार्षिक उत्पन्न मर्यादा इतर मागास प्रवर्गासाठी नॉन क्रिमीलेअर करीता असलेल्या रु. ८.०० लक्ष इतकी राहील. (सक्षम प्राधिकरणाने वेळोवेळी दिलेल्या नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्रानुसार)

**३) प्रकल्प क्षेत्रानुसार लक्ष्यांक अंदाजपत्रक :-**

| | | |
|---|---|---|
| १. | कृषी, संलग्न व पारंपारिक उपक्रम | एकूण आर्थिक तरतुदीच्या ६०% रक्कम |
| २. | लघु उद्योग व मध्यम उद्योग -(अ) उत्पादन (ब) व्यापार व विक्री | २) व ३) साठी एकूण आर्थिक तरतुदीच्या ४०% रक्कम |
| ३. | सेवा क्षेत्र | |

४) **लाभार्थींच्या पात्रतेच्या अटी:-**

१. महाराष्ट्राचा रहिवासी असावा.
२. वय वर्ष १८ ते ५० वर्ष असावे.
३. लाभार्थींचे कर्ज खाते आधार कार्ड लिंक असणे अनिवार्य राहील.
४. वेबपोर्टल/ महामंडळाच्या संगणक प्रणालीवर नाव नोंदणी अनिवार्य.
५. उमेदवाराने अर्ज करतेवेळी या प्रकल्पासाठी व यापुर्वी महामंडळाच्या किंवा इतर महामंडळाच्या कोणत्याही योजनेचा लाभ घेतलेला नसावा.
६. उमेदवार कोणत्याही बँकेचा / वित्तीय संस्थेचा थकबाकीदार नसावा.
७. उमेदवाराने कर्ज प्रकरण हे सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) अथवा तत्सम संगणक प्रणालीद्वारे प्रकरण हाताळण्यास सक्षम असलेल्या बँकेत केलेले असावे.
८. कुटुंबातील एका व्यक्तीला केवळ एकदाच या योजनेचा लाभ घेता येईल.

५) **परताव्याच्या अटी :-**

१. जर लाभार्थ्याने मध्येच नियमित कर्ज परतफेड नाही केली तर व्याज परतावा दिला जाणार नाही.

२. लाभार्थ्याने ऑनलाईन पोर्टलवर उद्योग सुरु असल्याचे किमान दोन फोटो अपलोड करावेत.

६) **महामंडळामार्फत लाभार्थ्यांस कर्जाच्या व्याज रकमेचा परतावा:-** उमेदवाराने वेळेत कर्जाचे हप्ते भरल्यास, हप्ता भरल्यावर त्यातील व्याजाची रक्कम (१२ टक्के मर्यादेत) त्याच्या आधार लिंक बँक खात्यात दरमहा महामंडळामार्फत जमा करण्यात येईल. सदर योजना संपुर्णपणे संगणकीकृत असुन प्रक्रिया सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) अथवा तत्सम संगणक प्रणालीद्वारे राबविण्यात येईल. महामंडळ केवळ बँकेने वेळेत वसुल केलेली योग्य व्याज रक्कम अदा करेल, याऐवजी इतर कोणतेही Charges/Fees/देयके अदा करणार नाही.

७) **उमेदवारांची नांव नोंदणी -** उमेदावारांनी शासनाच्या अधिकृत वेबपोर्टलवर अर्ज सादर करणे बंधनकारक असेल प्रस्ताव सादर केल्यावर दिलेल्या अटी व शर्ती नुसार प्रस्ताव पात्र ठरत असल्यास उमेदवारास संगणकीकृत सशर्त हेतूपत्र (Letter of intent) / मंजूरीपत्र दिले जाईल. उमेदवाराने या आधारे बँकेकडून कर्ज प्रकरणांवर कर्ज मंजूर करुन घ्यावे.

८) **प्रशासकीय बाबींवरील खर्च:-** प्रतिवर्षी प्राप्त सहाय्यक अनुदानातून २ टक्के रक्कम योजनेच्या अंमलबजावणीकरीता खालील बाबींकरिता निधी राखीव ठेवण्यात येईल.

**अ.** महामंडळाच्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण, योजनेची प्रसिध्दी इतर प्रशासकीय खर्चाकरिता

**ब.** योजनेच्या संगणकीकृत अंमलबजावणीकरिता लागणारा खर्च.

९) **योजनेचे सर्वसाधारण सनियंत्रण: -** (अ.) दरवर्षी महामंळामार्फत केले जाईल. (ब.) महामंडळाचे जिल्हा स्तरावरील योजनेच्या अंमलबजावणीचे काम आवश्यकतेनुसार मुख्यालयातील व्यवस्थापकीय संचालक, महाव्यवस्थापक, उपमहाव्यवस्थापक व इतर वरिष्ठ अधिकारी हे वेळोवेळी भेट देऊन तपासतील.

१०) या व्याज परतावा योजनेचा लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात येत असून या समितीत लाभार्थ्यांनी त्या बँकेकडून कर्ज घेतले आहे त्या बँकेचे व्यवस्थापक, संबंधित जिल्ह्याचे सहायक आयुक्त, समाज कल्याण हे सदस्य असतील व संबंधित महामंडळाचे जिल्हा व्यवस्थापक सदस्य सचिव असतील. या योजनेंतर्गत संपुर्ण कर्ज रक्कम बँक देणार असल्याने सदर प्रस्ताव जिल्हा लाभार्थी निवड या समितीमार्फत करण्यात येईल.

११) **उद्दिष्ट :-**सर्व जिल्हा कार्यालयांना समान भौतिक व आर्थिक उद्दिष्ट देण्यात येईल. तथापि, योग्य व सक्षम लाभार्थी आल्यास ते जिल्हानिहाय कमी अधिक करून मुख्यालयाच्या परवानगीने त्यात बदल करता येईल.

१२) **आर्थिक तरतूद :-**

१. प्रति जिल्हा किमान १०० लाभार्थींना सरासरी रु. १०.०० लक्ष प्रकल्प किंमतीचे प्रस्ताव मंजूर होतील याप्रमाणे प्रति जिल्हा रु. १०.०० कोटी मंजूर प्रकरणात सर्व ३६ जिल्हयातील प्रति वर्षी बँकेमार्फत मंजूर ३६०० लाभार्थींना रु. ३६०.०० कोटी निधी बँकेमार्फत वितरीत केला

जाईल. त्यावर १२ टक्के प्रमाणे व्याज परतावासाठी रु.५०.०० कोटी महामंडळ सहायक अनुदानातून मंजूर करण्यात येईल.

२. लाभार्थींना व्याज परतावा अदा करण्याकरिता प्रतिवर्षी महामंडळास किमान रु. ५०.०० कोटींची वेगळी तरतूद व उपलब्धता या योजनेकरिता करण्यात येईल. दोन्ही महामंडळासाठी प्रतीवर्षी रुपये १००.०० कोटी इतका वार्षिक खर्च येईल. सदरचा खर्च महामंडळाला मंजूर केलेल्या सहाय्यक अनुदानातून भागविण्यात येईल.

१३) **अनुदान:-** या योजनेंतर्गत लाभार्थींना अदा करण्यात येणारी व्याज परतावाची रक्कम अनुदान स्वरुपात अदा करण्यात येईल.

१४) **योजनेचे मुल्यांकन:-** सदर योजनेचे मुल्यांकन आवश्यकतेनुसार मान्यताप्राप्त संस्थांकडून विहित कार्यपध्दती अवलंबून करण्यात येईल.

**०२.** या योजनेचा आढावा १ वर्षाने घ्यावा व सदर योजना सुरु ठेवावी किंवा कसे याचा निर्णय घेण्यात यावा.

**०३.** मा.मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेप्रमाणे सदर योजनेसाठी नविन लेखाशिर्ष प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात यावी.

**०४.** सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३/१९/१४१३, दि.१४/०१/२०१९तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.--,दि. ११/०१/२०१९ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यत आला असून त्याचा संकेतांक २०१९०१३११२२५०१२७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2019.01.31 12:37:16 +05'30'

(भा.र.गावित)

सह सचिव , महाराष्ट्र राज्य

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव
३) मा.विरोधी पक्ष नेता (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा.मंत्री / राज्यमंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
५) मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
७) अध्यक्ष/उपाध्यक्ष/व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ,मुंबई

८) अध्यक्ष/ उपाध्यक्ष /व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई

९) मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिवि/ सचिव

१०) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे

११) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे

१२) सह सचिव/ उप सचिव (महामंडळे), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) सह सचिव / उप सचिव (महामंडळे), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१४) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण

१५) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण

१६) महालेखापाल (ले.व अ.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर

१७) महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर

१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई / ठाणे

१९) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई

२०) वित्त विभाग (का-व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई

२१) नियोजन विभाग (कार्यासन १४१३), मंत्रालय, मुंबई

२२) सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती महामंडळ (मर्या.), मुंबई

२३) सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि आर्थिक विकास महामंडळ (मर्या.), मुंबई

२४) सर्व जिल्हा व्यवस्थापक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती महामंडळ (मर्या.)

२५) प्रधान सचिव (विजाभज) यांचे स्वीय सहाय्यक

२६) सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई

२७) सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई

२८) निवडनस्ती (महामंडळे) विजाभज, इमाव व विमाप्र विभाग, मंत्रालय, मुंबई